**महिला व बालकांविषयी दाखल होणाऱ्या गुन्ह्यांच्या तपासाबाबत करावयाची कार्यवाही.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: पीएडब्ल्यू-१२२१/प्र.क्र.४२९/विशा-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ३१ डिसेंबर, २०२१.

**शासन परिपत्रक**

महिला व बालकांविषयी दाखल गुन्ह्यांच्या तपासा संदर्भात पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई व विशेष पोलीस महासंचालक, महिला व बाल अपराध प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून वेळोवेळी परिपत्रकांद्वारे सूचना देण्यात आलेल्या आहेत. असे असून देखील विरार पोलीस ठाणे येथे गु.र.क्र. ८७०/२०२१, भा.दं.वि. कलम ३६३, ३७६ (२) (एन) सह लैंगिक अपराधापासून बालकांचे संरक्षण अधिनियम, २०१२ चे कलम ४, ८, १० अन्वये दाखल गुन्ह्यातील बेपत्ता अल्पवयीन मुलगी मिळून आल्यानंतर तिची वैद्यकीय तपासणी करण्यात आली. सदर वैद्यकीय तपासणीमध्ये सदर मुलगी २३ आठवड्यांपेक्षा जास्त कालावधीची गर्भवती असल्याचे निष्पन्न झाले. असे असताना देखील नमुद गुन्ह्यातील तपासी अधिकारी यांनी सदर पिडीत मुलीस लैंगिक अपराधापासून बालकांचे संरक्षण अधिनियम, २०१२ चे कलम १९ मधील पोट कलम (६ ) मध्ये नमुद केल्याप्रमाणे तिला तिची वैद्यकीय तपासणी पूर्ण झाल्यानंतर २४ तासाचे आत संबंधित महिला व बाल कल्याण समिती यांचे समक्ष उपस्थित करणे अपेक्षित होते. परंतु, तपासी अधिकारी यांनी तसे न करता तिला ४५ दिवसानंतर महिला व बाल कल्याण समिती, पालघर यांचे समक्ष सादर केले. परिणामी सदर पिडीत मुलगी ही त्यावेळी ३० आठवड्यांची गर्भवती झाली व त्यामुळे तिचा गर्भपात करण्यास उशिर झाला व गर्भपात करता आला नाही. याबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट पिटीशन क्र. २६८७३/२०२१ दाखल करण्यात आली असुन सदर प्रकरणी न्यायालयाने नाराजी दर्शविली आहे.

या घटनेच्या पार्श्वभूमीवर महिला व बालकांविषयीच्या गुन्ह्यांच्या तपासाबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करणेबाबत राज्यातील सर्व पोलीस घटक प्रमुख, तपासी अधिकारी यांना या परिपत्रकान्वये सूचीत करण्यात येत आहे:-

१. पिडीत अल्पवयीन असेल तर तिची/त्याची तक्रार तिच्या/त्याच्या भाषेत, तिच्या/त्याच्या शब्दांमध्ये, तिच्या/त्याच्या नातेवाईकांच्या उपस्थितीत तसेच कमीत कमी महिला पोलीस उपनिरीक्षक दर्जाच्या अधिकाऱ्याने घ्यावी. (लैंगिक अपराधापासून बालकांचे संरक्षण अधिनियम, २०१२ चे कलम २४)

२. पिडीत अल्पवयीन बालकांची वैद्यकीय तपासणी ही फौजदारी प्रक्रिया संहितेच्या कलम १६४-अ, लैंगिक अपराधापासून बालकांचे संरक्षण अधिनियम, २०१२ कलम २७ प्रमाणे करण्यात यावी.

३. लैंगिक अपराधापासून बालकांचे संरक्षण अधिनियम, २०१२ चे कलम १९ मधील पोट कलम (६) मध्ये नमुद केल्याप्रमाणे पिडीत महिला हिस महिला व बाल कल्याण समिती यांचे समक्ष २४ तासाचे आत हजर करण्याची दक्षता घ्यावी.

४. भारतीय दंडविधान संहिता कलम २२८- क नुसार विवक्षित अपराधांना बळी पडलेली व्यक्ती कोण ते उघड करण्यास मनाई आहे. त्यामुळे भारतीय दंडविधान संहिता कलम २२८- क मधील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ कलम १०७ मध्ये नमुद केल्याप्रमाणे प्रत्येक पोलीस ठाणेत स्वतंत्र बाल कल्याण पोलीस अधिकारी नेमण्यात यावा.

६. बलात्कार व बालकांवरील लैंगिक अत्याचार झालेल्या पिडीत यांना अर्थसहाय्य व पुनर्वसन करण्यासाठी मनोधैर्य योजनेचा लाभ मिळवून देणेबाबत तपसी अधिकारी यांनी महाराष्ट्र शासन, महिला व बाल विकास विभागाच्या शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.२५५/का-२, दिनांक ३०.१२.२०१७ बाबत मार्गदर्शन करावे. तसेच मनोधैर्य योजनेअंतर्गत अर्थसहाय्य मिळण्यास पात्र पिडीतांचे प्रस्ताव संबंधित कार्यालयांकडे विहित वेळेत सादर करण्यात यावेत.

७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी महाराष्ट्र पोलीस अकादमी येथे मुलभूत प्रशिक्षण घेत असतानाच सर्व पोलीस अधिकारी यांचेसाठी, तसेच नव्याने भरती झालेल्या पोलीस अंमलदारांना पोलीस प्रशिक्षण विद्यालयामध्ये प्रशिक्षण घेत असताना "लैंगिक अपराधापासून बालकांचे संरक्षण अधिनियम, २०१२" तसेच "बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५" बाबतची पाठ्यक्रमात आवश्यक ती तरतुद करावी.

८. सर्व घटक प्रमुख यांनी त्यांच्या घटकातील अधिकारी/अंमलदार यांचेसाठी सदर संदर्भात संवेदनशिलता वाढवण्याच्या अनुषंगाने वेळोवेळी कार्यशाळेचे आयोजन करावे.

९. सदर कार्यशाळेचे आयोजन करण्यासाठी गरजेनुसार महिला व बाल विकास विभाग, संबंधित अशासकीय संघटना, तज्ज्ञ संस्था आणि इतर यांची मदत घ्यावी.

१०. विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला व बाल अपराध प्रतिबंधक विभाग यांनी सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांचे पालन होणेबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा व आवश्यकतेप्रमाणे संबंधित घटकांना मार्गदर्शन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२३११७१२३५२०२९ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
Date: 2021.12.31 17:13:43 +05'30'

**(राहुल कुलकर्णी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (गृह/शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (गृह/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
१२. विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला व बाल अपराध प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. राज्यातील सर्व पोलीस घटक प्रमुख यांना पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे मार्फत.
१४. निवडनस्ती (विशा-६), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.